**महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री कै.वसंतराव नाईक यांची जयंती राज्यात दि.१ जुलै,२०१५ रोजी कृषि दिन म्हणून साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
शासन निर्णय क्रमांक:कृषिदि-३४१५/प्र.क्र.१२७/३अे
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १५/०६/२०१५

**संदर्भ:- शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**१) संकीर्ण-१०८९/प्र.क्र.३८/१२अे, दि.२१ जून,१९८९.**
**२) कृषिवि-३८०९/प्र.क्र.१२३/३अे, दि.१२ जून,२००९.**
**३) कृषिवि-३८११/प्र.क्र.१२७/३अे, दि.२२ जून,२०११.**
**४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेमासे/कृषिदिन दि.१ जुलै/८०७/१५, दि.२९ एप्रिल, २०१५**

**प्रस्तावना:**

महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री कै. वसंतराव नाईक यांनी कृषि क्षेत्रात केलेली भरीव कामगिरी लक्षात घेवून त्यांची जयंती दि.१ जुलै रोजी राज्यात कृषि दिन म्हणून साजरी करण्याचा निर्णय शासनाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

दि.१ जुलै, २०१५ रोजी राज्यात प्रतीवर्षीप्रमाणे कृषि दिन म्हणून साजरा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. कृषि दिनानिमित्त प्रत्येक पंचायत समितीकरीता जास्तीत जास्त रु.१५००/- (रु.एक हजार पाचशे) यानुसार ३५१ पंचायत समित्यांकरिता रु.५,२६,५००/- (रु.पाच लाख सव्वीस हजार पाचशे मात्र) तसेच जिल्हा परिषद मुख्यालयी कृषिदिन साजरा करण्यासाठी प्रत्येक जिल्हा परिषदेकरीता रु.२०००/- (रु. दोन हजार मात्र) या प्रमाणे एकूण ३४ जिल्हा परिषदांकरीता रु.६८,०००/- अशा एकूण रु.५,९४,५००/-(रुपये पाच लाख चौव-याण्णव हजार पाचशे मात्र) एवढया खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. कृषि दिन साजरा करण्याबाबत मार्गदर्शक सूचना आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधितांना द्याव्यात. कृषि आयुक्तांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांतील बाबीवर सदर खर्च करण्यात यावा. तसेच चित्रफिती दाखविणे, शेतकऱ्यांसाठी चहापाणी, जिल्हा परिषद स्तरावर छोटेसे प्रदर्शन इत्यादी खर्च आणि मंडप, हारतुरे, फोटो वगैरे आवश्यक बाबींकरिता खर्च करण्यात यावा.

३. या प्रित्यर्थ येणारा खर्च जिल्हा परिषद सेस फंडातील उपलब्ध असलेल्या अनुदानातून करण्यात यावा. हा खर्च भागविण्याकरिता सर्व जिल्हयातील मुख्य कार्यकारी अधिकारी व कृषि अधिकारी यांनी जिल्हा सेस फंडातून खर्च करण्याकरीता आयुक्त (कृषि) यांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार कार्यवाही करावी. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीची जबाबदारी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१३०४०१६६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh
Madhukar
Madan

Digitally signed by Umesh Madhukar Madan
DN: CN = Umesh Madhukar Madan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretory
Date: 2015.06.16 13:05:46 +05'30'

(उ.म.मदन)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
२) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३) मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
६) सर्व कृषि विद्यापीठांचे कुलगुरु
७) कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,अकोला
९) व्यवस्थापकयीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई प्रसिध्दीच्या विनंतीसह (५ प्रती)
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर.
१२) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ / विधान मंडळ ग्रंथालय (१० प्रतीसह)
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) सर्व जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१६) सर्व विभागीय आयुक्त
१७) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) सर्व कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०) सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
२१) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२२) सर्व तालुका कृषि अधिकारी
२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२४) सर्व सहसचिव / उपसचिव , कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२५) वसंतराव नाईक, राज्य कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
२६) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
२७) निवडनस्ती (३ अे)